सन २०२४-२५ करीता महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनेंतर्गत (MEMS) कार्यान्वित रुग्णवाहिकांवरील आवर्ती खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत. (माहे, नोव्हेंबर २०२४ ते माहे, जानेवारी, २०२५ च्या ३० टक्के देयकाची रक्कम)

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक:- ईएमएस-२०२३/प्र.क्र.१३९ /आरोग्य -३
१० वा मजला , गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१
दिनांक:- २९ मार्च, २०२५.

वाचा:-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- ईएमएस-२०११/प्र.क.२२४/ आरोग्य-३, दिनांक २८ मार्च, २०१३.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- पीएचडी-३००११/प्र.क्र.३८७/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक १५ जून, २०१६
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- ईएमएस- २०१८/प्र.क्र.२७०/ आरोग्य -३, दिनांक ०८ मे, २०१९.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- ईएमएस- २०१८/प्र.क्र.२७०/ आरोग्य -३, दिनांक २९ जुलै, २०१९.
५) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- ईएमएस-२०१८/प्र.क्र.२७०/ आरोग्य -३ , दिनांक ०४ जानेवारी, २०२०.
६) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- ईएमएस-२०१९/ प्र.क्र.१७७/ आरोग्य -३, दिनांक १७ मार्च, २०२०, ७ जुलै,२०२० व १६ ऑक्टोबर, २०२०
७) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- ईएमएस-२०२१/प्र.क.९६/ आरोग्य-३, दिनांक २५ मे, २०२१.
८) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- समिती-२०२३/प्र.क्र.१५२/आरोग्य-३, दिनांक २९ जानेवारी, २०२४
९) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- समिती २०२३/ प्र.क्र.१५२/ आरोग्य -३, दिनांक ०२ मे, २०२४.
१०) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- समिती २०२३/ प्र.क्र.१५२/आरोग्य -३, दिनांक २९ जुन, २०२४.
११) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:- समिती २०२३/ प्र.क्र.१५२/ आरोग्य -३, दिनांक १९ डिसेंबर, २०२४.
१२) आरोग्य सेवा आयुक्तालयाचे पत्र क्रमांक:- आसेआ/कक्ष-३/टे-४/ MEMS-१०८/ नोव्हें २४ ते जाने २५ ३०% देयक /२०२५, दि.२८.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यात आपदग्रस्तास तातडीने वैद्यकीय मदत मिळावी याकरीता अत्याधुनिक दळणवळण यंत्रणेसह वैद्यकीय उपकरणांनी सुसज्ज अशा रुग्णवाहिकांची सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या माध्यमातून संपुर्ण राज्यात २३३ ॲडव्हान्स लाईफ सपोर्टींग (ALS) आणि ७०४ बेसिक लाईफ सपोर्टींग (BLS) अशा एकूण ९३७ रुग्णवाहिकांची आपत्कालीन प्रतिसाद सेवा (EMS) ५ वर्षाकरीता राबविण्यासाठी मे.बी.व्ही.जी. इंडिया लि. या सेवा पुरवठादाराशी करार करुन दिनांक २६ जानेवारी, २०१४ पासून कार्यान्वित करण्यात आली. तद्नंतर उपरोक्त अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ पासून सदर योजना राष्ट्रीय आरोग्य अभियानाकडून संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात आली. यास्तव सन २०१६-१७ पासून सदर योजना राज्य योजना म्हणून कार्यान्वित आहे. सदर योजनेबाबत सेवापुरवठादाराशी केलेल्या करारपत्रानुसार सदर कराराची मुदत दि.३१ जानेवारी, २०१९ रोजी संपुष्टात आली. तथापि, रूग्णसेवेमध्ये अडचणी न येता रूग्णवाहिका सेवा विनाखंड सुरू राहण्यासाठी तातडीची बाब म्हणून दिनांक ०१ फेब्रुवारी, २०१९ ते ३१ जानेवारी, २०२१ या कालावधीत अ.क्र. ३ ते ७ अन्वये विविध आदेशान्वये तात्पुरती मुदतवाढ देण्यात आली. त्यानंतर वरील अ.क्र. ७ अन्वये अ.मु.स. (वित्त) यांच्या अध्यक्षतेखालील समितीच्या शिफारशीनुसार व मा. मंत्रीमंडळाने दिलेल्या अंतिम निर्णयानुसार जुन्या पुरवठादारास अटींच्या अधीन राहून सदर करारास दि.२५ मे, २०२१ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०२.२०१९ ते दि.३१.०१.२०२४ पर्यंत व तद्नंतर शासन पत्र क्र. समिती-२०२३/प्र.क्र.१५२/आरोग्य-३, दि.२९/०१/२०२४ अन्वये तेंव्हाच्याच अटी व शर्तीनुसार दि.१ फेब्रुवारी, २०२४ ते ३० एप्रिल, २०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ दिली होती. शासन पत्र क्र समिती-२०२३/ प्र.क्र.१५२/ आरोग्य-३, दिनांक ०२ मे, २०२४ अन्वये महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनांतर्गत (MEMS) कार्यरत शासनाच्या ९३७ रूग्णवाहिका (टोल फ्री क्र. १०८) जुन्या सेवा पुरवठादाराकडून ताब्यात घेऊन नवीन संयुक्त सेवा पुरवठादार मे.सुमित फॅसिलिटीज, मे. बी.व्ही.जी इंडिया लि. व मे. एस.एस.जी ट्रान्सपोर्ट सेनेटेरीयो एस.एल या संयुक्त पुरवठादारास दिनांक ३० जून, २०२४ पर्यंत किंवा नवनियुक्त सेवा पुरवठादारासोबत नवीन अटी व शर्तीनुसार MoU होऊन त्यानुसार कार्यवाही सुरू होईपर्यंत यापैकी जे आधी होईल तोपर्यंत सदर सेवा चालविण्यास दिनांक २५ मे, २०२१ च्या शासन निर्णयानुसार ज्या अटी व शर्तीसह करार करण्यात आला होता त्या अटी व शर्तीनुसार चालविण्यास परवानगी / निर्देश देण्यात आलेले होते. तद्नंतर शासन पत्र क्र. समिती-२०२३/ प्र.क्र.१५२/ आरोग्य-३, दि. २९ जुन, २०२४ अन्वये दि. ०२ मे, २०२४ रोजीच्या पत्रामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधिन राहून दि. ३१ डिसेंबर, २०२४ पर्यंत किंवा नवनियुक्त सेवा पुरवठादारासोबत नवीन अटी व शर्तीनुसार MoU होऊन त्यानुसार कार्यवाही सुरू होईपर्यंत यापैकी जे आधी होईल तोपर्यंत सदर सेवा सुरू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आलेली होती. त्यानंतर शासन पत्र क्र. समिती-२०२३/प्र.क्र.१५२/आरोग्य-३, दि. १९ डिसेंबर, २०२४ अन्वये

दि. ०२ मे, २०२४ रोजीच्या विभागाच्या पत्रामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून सध्या अस्तित्वात असलेली विषयाधीन सेवेची व्यवस्था दि.३०.०६.२०२५ पर्यंत किंवा नवनियुक्त सेवा पुरवठादारासोबत नवीन अटी व शर्तीनुसार MoU होऊन त्यानुसार कार्यवाही सुरू होईपर्यंत यापैकी जे अगोदर होईल तोपर्यंत सुरु ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर योजनेवरील माहे नोव्हेंबर, २०२४ ते माहे जानेवारी, २०२५ या तिमाहीचे एकूण देयक रू.१००,५३,७६,५४५.००/- पैकी ७० टक्के प्रमाणे रू.७०,३७,६३,५८२/- एवढी रक्कम अदायगी करण्यात आली आहे व उर्वरीत ३० टक्के देयक रू.३०,१६,१२,९६४.००/- (अक्षरी रुपये तीस कोटी सोळा लक्ष बारा हजार नऊशे चौसष्ठ फक्त) अदा करण्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनेंतर्गत कार्यान्वित असलेल्या सुसज्ज रुग्णवाहिकांवरील माहे नोव्हेंबर २०२४ ते माहे जानेवारी २०२५ या कालावधीतील ३० टक्के देयक एकुण रू.३०,१६,१२,९६४.००/- (अक्षरी रुपये तीस कोटी सोळा लक्ष बारा हजार नऊशे चौसष्ठ फक्त) या रकमेपैकी नाशिक जिल्हयातील कार्यान्वित रूग्णवाहिकांसाठीचे रू.१,४५,५२,१८६/- एवढया रक्कमेचे देयक रोखून उर्वरित रु.२८,७०,६०,७७८/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी सत्तर लक्ष साठ हजार सातशे अठ्ठ्याहत्तर फक्त) इतक्या रकमेचे देयक अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रुग्णवाहिकांमार्फत पुरविण्यात आलेल्या सेवांचा तपशिल दरमहा शासनास सादर करण्यात यावा. करारानुसार मूळ देयकातील उर्वरीत ३० टक्के रक्कम अदा करतांना माहे नोव्हेंबर २०२४ ते माहे जानेवारी २०२५ या कालावधीतील रू.१,३०,६०,११५/- (अक्षरी रूपये एक कोटी तीस लक्ष साठ हजार एकशे पंधरा फक्त) इतकी दंडात्मक रक्कम वजाती करुन घेण्यात यावी.

३. या बाबीवरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, ०१ किमान गरजा कार्यक्रम (०१) (१०) - ट्रॉमा केअर युनिटची स्थापना - महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा, (२२१०४६८९) - १३ - कार्यालयीन खर्च या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उपविभाग-४ मधील अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा प्रस्ताव आयुक्त (आरोग्य सेवा) यांच्या मान्यतेने आल्यामुळे, सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये) यांनी देयक अदा करण्यासाठी कोषागारात त्वरीत सादर करावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१५०५५८७४१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivdas Mahadeo Dhule

Digitally signed by Shivdas Mahadeo Dhule
DN: cn=Shivdas Mahadeo Dhule, o, ou, email=shivdas.dhule@nic.in, c=US
Date: 2025.03.29 18:37:33 +05'30'

**(शि. म. धुळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा),महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
५. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
६. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
१०.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा/लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (आरोग्य -३)